**Convertion in Regular Temparary Establishment:-Shri.Rameshwar J.Chavhan working under Superintending Engineer, Washim Irrigation Circle, Washim**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता,वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम - श्री.रामेश्वर जयराम चव्हाण, मजूर**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एसयुटी-२००४/(३१/०४)/आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- ०९/०६/२०११

पहावे:-:१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र:- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५,दिनांक २४.४.२००१.

२) अधिक्षक अभियंता,वाशिम पाटबंधारे मंडळ यांचे पत्र क्र:३४०६/न्या.प्र./०९, दिनांक- ०७.१०.२००९.

**प्रस्तावना** :-

श्री.रामेश्वर जयराम चव्हाण, मजूर हे लघु पाटबंधारे विभाग, वाशिम अंतर्गत दिनांक २.७.९० ते दिनांक ३०.४.९१ या कालावधीत रोजंदारी आस्थापनेवर कार्यरत होते. कामावरुन कमी केल्यामुळे त्यांनी मा.कामगार न्यायालयात दावा क्रमांक १८१/९१ दाखल केला. सदर दाव्याचा अंतरिम निर्णय दिनांक १०.७.९१ रोजी होवून श्री.चव्हाण यांना कामावर घेण्याचे न्यायालयाने आदेश दिले. क्षेत्रिय कार्यालयाने अंतिम निर्णयाच्या अधिन राहून श्री.चव्हाण यांना कामावर हजर करुन घेतले.मा.कामगार न्यायालयात दाखल केलेल्या दाव्याच्या सुनावणीच्या तारखेस क्षेत्रिय अधिकारी उपस्थित राहत होते. परंतु श्री.चव्हाण यांनी सुनावणीच्या तारखेस हजर राहणे बंद केल्यामुळे न्यायालयाने दिनांक १.३.२००० रोजी अंतिम आदेश पारित करुन सदर प्रकरण खारीज केल्यामुळे क्षेत्रिय कार्यालयाने श्री. चव्हाण यांना तात्काळ कमी केले. श्री.चव्हाण यांना कामावरुन कमी केल्यामुळे त्यांनी कामगार न्यायालयात दावा क्रमांक ५५/२००० दाखल करुन जुने प्रकरण क्रमांक १८१/९१ पुनर्जिवित केले. त्यानंतर कामगार न्यायालयाने दिनांक ३.१२.२००१ ला आदेश पारित करुन जुने प्रकरण क्रमांक १८१/९१ पुन्हा न्यायप्रविष्ठ ठेवले असल्यामुळे श्री.चव्हाण यांना कामावर घेणे क्रमप्राप्त असल्याचे क्षेत्रिय अधिकारी तसेच सदर प्रकरणाशी संबंधित असलेल्या शासकिय अभियोक्ता यांनी अभिप्राय दिले होते.श्री.रामेश्वर चव्हाण यांनी दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक १८१/९१ वरील अंतरिम आदेशाविरुध्द मा.औद्योगिक न्यायालयात रिव्हिजन दाखल होवू शकेल काय याबाबत विधी व न्याय विभाग, नागपूर यांचे अभिप्राय घेण्यात आले असता मा.कामगार न्यायालयाने दिनांक ३.१२.२००१ रोजी दिलेल्या निर्णयाप्रमाणे कार्यवाही करणे आवश्यक असल्याचे अभिप्राय, विधी व न्याय विभागाने दिले आहेत. त्याप्रमाणे सचिव समितीच्या मान्यतेने श्री.रामेश्वर चव्हाण यांना मा.कामगार न्यायालयाच्या दावा क्रमांक १८१/९१ मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून मागिल कोणतीही थकबाकी न देता मजूर पदी रोजंदारी आस्थापनेवर दिनांक-१०/११/२००४ रोजी घेण्यात आले आहे व ते अद्याप कार्यरत आहेत. मा.कामगार न्यायालय, अकोला यांनी दावा क्रमांक १८१/९१ संदर्भात दिनांक-१६/०७/२००८ रोजी श्री.रामेश्वर चव्हाण यांना पुवीच्या चौकीदारपदी सामावून घेवून सेवासातत्य दयावे असा अंतिम निर्णय दिला आहे.

सद्या श्री.चव्हाण यांचे कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही.श्री.रामेश्वर चव्हाण यांची प्रथम नियुक्ती दिनांक २.७.१९९० असून क्षेत्रिय कार्यालयाने पाठविलेल्या प्रस्तावानुसार शासन निर्णय दिनांक २४.४.२००१ नुसार दिनांक ३१.१२.९८ पूर्वी श्री.चव्हाण यांची सेवेची ५ वर्ष पूर्ण होत असल्यामुळे श्री.चव्हाण यांना मा.कामगार न्यायालयाच्या दावा क्रमांक १८१/९१ मध्ये झालेल्या अंतिम निर्णयानुसार चौकीदारपदी रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

अधिक्षक अभियंता,वाशिम पाटबंधारे मंडळ अंतर्गत श्री.रामेश्वर जयराम चव्हाण, यांची प्रथम नियुक्ती दिनांक ०२/०७/१९९० असून दिनांक-०७/०५/१९९१ रोजी श्री.रामेश्वर चव्हाण यांनी कामाचे २४० दिवस भरले असल्यामुळे त्यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र. | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.रामेश्वर जयराम चव्हाण | रोजंदारी | ०२/०७/१९९० | ०२/०७/१९९५ | चौकीदार | रु. ७५०- ९४० (जुनी) रु. २५५० -३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री.रामेश्वर जयराम चव्हाण,यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता,वाशिम पाटबंधारे मंडळ यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वत:च्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिश: निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या

सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५. श्री.रामेश्वर जयराम चव्हाण यानी न्यायालयीन निर्णयाप्रमाणे दिनांक.०२/०७/१९९५ ते दिनांक-१६/०७/२००८ या कालावधीतील वेतन फरकाची थकबाकीची रक्कम देय होणार नाही. तथापी श्री.रामेश्वर जयराम चव्हाण, यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

६. या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०६०९११०५५९००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

अ.अ.कोदे

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२
अधिक्षक अभियंता,वाशिम पाटबंधारे मंडळ, ,वाशिम
कार्यकारी अभियंता, पाटबंधारे बांधकाम विभाग, ,वाशिम
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ